# फिन मैककूल आणि मोठा मासा

ईव

मराठी : अश्विनी बर्वे



फिन मैककूल एक पौराणिक राक्षस होता -  तो खूप ताकदवान आणि दयाळू होता. पण तो स्मार्ट नव्हता- ... थोड़ा बुद्धू होता." मग  एका बुद्धिमान व्यक्तीने फिनला एका मोठ्या माशाबद्दल सांगितले. ज्याच्याजवळ सगळ्या जगाचे ज्ञान होते. त्याने फिनला तो मासा पकडून खाण्याचा सल्ला दिला. मासा खाल्ल्यानंतर ते ज्ञान फिनला होईल. फिन तो मासा पकडतो पण दयाळू असल्याने तो माशाला मारत नाही.पण तरीही फिन मासे पकडण्याचे कौशल्य शिकला. मग फिन शहरातल्या लोकांकडून सन्मान मिळवतो तो केवळ आपल्या ताकदीवर आणि दयाळूपणावर नाही तर त्याच्या बुद्धिमुळे सुद्धा त्याला सन्मान प्राप्त होतो..



# फिन मैककूल आणि मोठा मासा

ईव





फिन मैककूल सगळ्या आर्यलंड मध्ये सगळ्यात मोठा राक्षस होता. तो आत्तापर्यंतचा सगळ्यात महान योद्धा होता.कोणीही त्याच्या ताकदीची बरोबरी करू शकत नव्हता.



तो कोणतेही घर उचलून त्याचं छप्पर मोडून त्याला सूर्याच्या समोर उघडं करू शकत होता. आणि रात्री त्याच घराचं तोंड चंद्राकडे करत असे. खराब हवामानात जेव्हा गाववाले पेंढा वाचवण्यासाठी धावपळ करत, तेव्हा फिन त्यांना मदत करत असे. तो घोडा-गाड्या आणि इतर सगळ्या वस्तू उचलून गोदामात सुरक्षित ठेवून देत असे.



“तो प्रामाणिक आणि मोठ्या मनाचा माणूस आहे,” आयर्लंडची माणसं त्याच्याबद्दल म्हणत. “आपण नशीबवान आहोत की तो आपल्या बरोबर इथं राहतो.”

पण सगळ्या लोकांना हे माहित होते की फिन मैककुल खूप हुशार नाही.

“तो थोड़ा बुद्धू आहे,“ ते कधी कधी कुजबुजत आणि मग प्रेमाने हसत. “त्याला जास्त माहिती नाही तरी पण तो एक प्रामाणिक आणि चांगला राक्षस आहे.”

एक दिवस फिनने लोकांचे बोलणे ऐकले, त्याला त्यांचं म्हणणं एकदम खरं वाटलं..

जवळच्या गावात एक म्हातारा माणूस राहत होता, तो खूप ज्ञानी होता. त्याने आपलं ज्ञान एका योग्य व्यक्तीला देण्याचं ठरवलं होतं. तो माणूस स्वतःच एक रहस्य होता. तो कधी आपल्या घरात राहत असे, आणि कधी कधी काही आठवडे गायब होत असे. कितीतरी लोकांनी त्याच्याकडचे ज्ञान मिळवण्यासाठी त्याच्याशी मैत्री करण्याचा प्रयत्न केला पण काही फायदा झाला नाही.

साइमन बेकर त्याच्यासाठी ताजा पाव घेवून येत असे त्यावर मोठा लोणाचा गोळा लावलेला असे. बर्टी तिची पांढरी कोंबडी घेवून येई, जी गावातली सगळ्यात चांगली कोंबडी होती. जिचं तो माणूस रोज सकाळी एक ताजं अंडं नाष्ट्याला खाऊ शकत असे. ब्रिडी त्याच्यासाठी एका गोणीत स्वतः कापलेली लाकडं घेवून येई, ज्यामुळे तो थंडीत स्वतःला गरम ठेवू शके.

म्हाताऱ्या माणसाने त्या सगळ्यांचे त्यांच्या दयाळूपणासाठी आभार मानले. पण त्याने आपलं रहस्य आपल्याजवळच ठेवले.



ब्रिडी येवून गेल्यानंतर एका दिवसाने फिन त्या म्हाताऱ्याकडे आला.

फिन त्याच्या घरात मावू  शकत नव्हता म्हणून तो बाहेर बसला आणि त्याने आपले हात त्याच्या घराच्या छतावर ठेवले.

“ऐका ना,” तो त्या म्हाताऱ्या माणसाला म्हणाला, “हे बघा मी फिन मैककुल आहे, मला विचारायचं आहे की तुम्ही तुमच्या ज्ञानाचं रहस्त्य माझ्याजवळ उघडं कराल का?

मग म्हातारा माणूस बाहेर आला, आणि मग फिन आपल्या गुडघ्यांवर बसला, त्यामुळे ते दोघं एकमेकांकडे नीट बघू शकतील.

“मला माहित आहे तू कोण आहेस ते आणि मी तुझ्या येण्याची वाट बघत होतो,” म्हाताऱ्या माणसाने सांगितले.

“मला माहित आहे की तुम्ही चांगले आणि दयाळू आहात आणि त्याच बरोबर खूप शक्तिशाली आहात. मला माहित आहे की तुम्ही आर्यलंड मधले एक महान योद्धा आणि मित्र आहेत. मला माहित आहे की तुम्ही दैत्य कुल्कुलनला हरवून आयर्लंडला वाचवलं होतं. पण मला तुम्हांला एक जरुरी प्रश्न विचारायचा आहे, तुमच्याजवळ इतकं सगळं काही आहे, मग तुम्हाला ज्ञानाची काय गरज आहे?”

"ज्ञाना शिवाय माणसाला काही अर्थ नाही," फिन म्हणाला. “ज्ञान मिळाल्या नंतर मी माझ्या मित्रांना अधिक चांगल्या प्रकारे मदत करू शकेल. आता मी त्यांच्या प्रश्नाच्या उत्तरासाठी फक्त मान हलवतो. पण मी योग्य उत्तर देवू शकेन. बुद्धिमान झाल्यानंतर गरज पडली तर मी आयर्लंडच्या भल्यासाठी पण मी माझा आवाज उठवू शकेन.”

मग म्हाताऱ्याने आपलं डोकं हलवलं. “तू एक विशाल दैत्य आणि एक चांगला माणूस आहे.पण ज्ञान मिळाल्यावर तुझा मान वाढेल. बरं ऐक. बॉयन नदी मध्ये एक मासा राहतो. एक सैलमन, ज्याचा रंग सूर्यास्तच्या आकाशा सारखा लाल आहे. त्याच्या दुनियेतला तो सगळ्यात अधिक समजूतदार आणि विवेकी मासा आहे. तू त्याला पकड आणि शिजव आणि खाऊन टाक.मग ते ज्ञान तुझं होईल.”

"धन्यवाद, सर," फिन म्हणाला.





दोन पावलातच फिन, बॉयन नदीवर पोहचला. त्याने आपलं मासं पकडण्याचं जाळं पाण्यात टाकलं. थंड पाण्यात वेगवेगळ्या रंगाचे मासे होते, पांढरी, चंदेरी, रुपेरी, तांब्याच्या नाण्यासारखी रंग असणारे मासे. पण तिथं सूर्यास्ताच्या वेळी आकाश जसे असते तसा लाल मासा नव्हता.

आणि मग फिनने महान लाल सैलमनला, आळशीपणे पोहतांना पाहिले. फिनने विचार केला, मला असं वाटतं की तो काहीतरी शोधत सैलमन मासा चहुबाजूंनी फिरला आणि मग त्याने फिनच्या गळाला लावलेल्या खाद्याला तोंड लावलं.फिनने माशाला बोयेन नदीच्या बाहेर ओढलं. मासा काहीतरी बडबडत होता आणि फिनला असं वाटलं की नदी आपल्या बुद्धिमान माशाला सोडू इच्छित नाही.



"मी मासा घेतला म्हणून माफी मागतो, पण मी ज्ञानाच्या शोधात आहे." फिन नदीला म्हणाला. "बघ, माशाच्या तुलनेत माणूस ज्ञानाचा अधिक उपयोग करू शकतो, म्हणून मी आपली क्षमा मागतो." त्याने माशाला आपल्या मोठ्या हातांमध्ये घेतलं आणि त्याचे सौंदर्य निरखू लागला.माशाची कातडी सूर्याच्या किरणांमध्ये चमकत होती.

फिनने माशाचे डोळे बघितले आणि तिथं त्याला बुद्धिचा सागर, दुनियेतले सगळे ज्ञान दिसले. त्याला माशात जीवन दिसले. तो त्याला कसा मारणार होता? तो त्याला कसा खाऊ शकणार होता? या विचाराने फिनला हादरून टाकलं. तो माशाला म्हणाला, "तुझ्याजवळ ज्ञान आहे ते मला हवं आहे, पण तुझं बलिदान देवून मला ज्ञान आणि विवेक नको."

सैलमनच्या तोंडात जिथं गळ अडकलेला होता, तिथून त्याच्या ओठातून रक्त येत होतं. “मला याबद्दल दुःख होत आहे,” फिन म्हणाला, आणि त्याने काळजीपूर्वक माशाच्या तोंडातून गळ काढला,पण तो काढल्यानंतर त्याचे हुक फिनच्या अंगठ्यात घुसले आणि त्याला खूप दुखायला लागलं. वेदना कमी करण्यासाठी फिनने तो अंगठा आपल्या तोंडात घातला आणि चोखला. त्याने आपलं रक्त चोखलं आणि सेलमनचे रक्त सुद्धा चोखले! मग फिनला आपल्या शरीरात एक दाह निर्माण झाल्यासारखं वाटलं,जशी एखादी अनोळखी गोष्ट शरीरात प्रवेश करत आहे, एखादी अजब आणि सुंदर गोष्ट.

मासा म्हणाला, “आपण मला जीवनदान दिलं त्याबद्दल आभार मानतो,मी माझा जीव देण्यास तयार होतो. पण आता माझी बुद्धी आणि विवेक माझ्या रक्तातून तुमच्या रक्तात मिसळले आहे. मला हे माहित आहे की तुम्ही या ज्ञानाचा उपयोग दुसऱ्यांच्या सेवेसाठी आणि आर्यलंडच्या हितासाठी कराल.

फिनने माशाकडे निरखून पाहिलं, “पण तू माझ्या पकडीत का आलात?” तुम्ही इतके समजदार आहात की तुम्हांला वाटलं असतं तर तुम्ही स्वतःचा बचाव करू शकला असता?”

“मला माहित होतं हा गळ कोणाचा आहे,मी तुमच्या येण्याची वाट बघत होते.”

"धन्यवाद." फिन म्हणाला, “मी या भेत्वस्तुचा चांगला उपयोग करेन.”



हळुवारपणे फिनने सैलमनला परत नदीत सोडलं आणि त्याला दूर पोहतांना पाहिलं. आता लाल रंग थोडासा फिका झाला होता का?



त्याने आपला अंगठा बघितला. जिथं टोचलं होतं, ती जखम आता बरी झाली होती आणि त्याचा अंगठा आता गुलाबी रंगाचा झाला होता.



फिनने ज्ञानी सैलमन बरोबर झालेल्या भेटीबद्दल कोणालाच सांगितले नाही, पण त्या म्हाताऱ्या माणसाला ही गोष्ट सांगायला हवी असे त्याला वाटलं. जेव्हा तो त्या म्हाताऱ्या माणसाच्या घरी गेला तेव्हा ते रिकामं होतं. म्हातारा कुठे निघून गेला होता. गोणीभर लाकडं तशीच पडली होती. स्वयंपाक घरात पाव तसाच पडला होता. कोंबड्याच्या खुराडातून कोणी अंडी काढलेली नव्हती.

पण रस्त्यात एक फुटपाथ होता त्यावर माशाचे पर विखुरलेले होते आणि प्रत्येक परातून आगी सारखं काहीतरी चमकत होतं.

त्यानंतर गावच्या लोकांनी टिप्पणी केली की, फिन किती बुद्धिमान झाला आहे. फिनने इंग्लडचा राजा आणि फ्रान्सचा राजा यांच्याशी बातचित केली आणि त्यांना आयर्लंडच्या गरजा आणि इच्छा यांची माहिती करून दिली.

त्याने आपल्या लोकांना वाइकिंग जहाजांपासून वाचवलं, जे आयरिश भूमी हडप करण्यासाठी समुद्र पार करून आले होते. त्याला आपल्या लोकांच्या समस्या माहित होत्या आणि लोकांचे त्याकडे लक्ष जाण्याआधी तो त्या सोडवत असे.



“पण तरीही तो पहिल्या सारखाच चांगला फिन आहे,” सगळे लोक या गोष्टीशी सहमत होते.

“हे एक कोडं तर नाही,की जेव्हा तो विचार करतो तेव्हा तो आपला अंगठा चोखतो? तुम्ही विचार कराल की कदाचित त्यात काहीतरी जादू आहे.”

कदाचित तुमचं म्हणणं बरोबर ही असेल.

समाप्त